**बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राथमिक शिक्षणावरील खर्चासाठी वेतन अनुदानाची प्रतिपूर्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बृमपा-२०२३/प्र.क्र.१०४/एसएम-४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०६ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१४२/एसएम-४, दिनांक ७ जुलै, २०१५,

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्र क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र. १४२/एसएम-४ दिनांक ७ जुलै, २०१६,

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. बृमपा-२०२०/प्र.क्र.०१/एसएम-४, दिनांक २९ मार्च, २०२३

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक ०१ जून, २०२३, दिनांक २७ ऑक्टोंबर, २०२३ व दिनांक १३ फेब्रुवारी, २०२४.

५) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग यांचे पत्र क्र.शिउस/प्राथ-५/बीएमसी अनुदान /२०२३-२४/१६३७, दिनांक २१ फेब्रुवारी, २०२४

**प्रस्तावना:-**

महानगरपालिका व नगरपालिकांना प्राथमिक शिक्षणावरील खर्चासाठी शालेय शिक्षण विभागामार्फत देण्यात येणा-या अनुदानाबाबत दि. १६ डिसेंबर, १९८७ च्या शासन निर्णयात सुधारणा करून संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णय, दि. ७ जुलै २०१५ अन्वये सुधारीत आदेश निर्गमित करण्यात आले आहे. या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अनुदान सूत्रानुसार राज्यातील महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषद/ कटक मंडळे यांना प्राथमिक शिक्षणाच्या मान्य बाबींवरील खर्चाची प्रतिपूर्ती राज्य शासनाद्वारे अनुज्ञेय आहे.

२. बृहन्मुंबई महानगरपालिकेने सादर केलेल्या प्रस्तावाची विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांच्यास्तरावरुन तपासणी करण्यात आली असून तपासणीअंती अनुज्ञेय अनुदानाची रक्कम निर्धारीत करण्यात आली आहे.

३. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग यांच्या संदर्भ क्र. (५) येथील दिनांक २१ फेब्रुवारी, २०२४ च्या पत्रानुसार प्रस्तावित केल्यानुसार, बृहन्मुंबई महानगरपालिकेस यापूर्वीच्या कालावधीसाठी खाजगी प्राथमिक शाळांचे अनुज्ञेय वेतन अनुदानाची प्रतिपूर्ती व प्रत्यक्षात देण्यात आलेल्या रक्कमेतील तफावत असलेल्या थकीत अनुदानाची प्रतिपूर्ती तसेच, सन २०१८-१९, २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील वेतन अनुदानाची प्रतिपूर्ती म्हणून एकूण रु.१७१,१७,४३,८२८/- रक्कम थकीत असल्याचे कळविले आहे. यामध्ये संदर्भ क्र. (४) येथील दिनांक १३ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रु. २,६३,५२,४८०/- इतकी रक्कम वजा करण्यात आली नव्हती. सदरहू रक्कम वजा जाता रु. १६८,५३,९१,३४८/- (रूपये एकशे अडूसष्ट कोटी त्रेपन्न लाख एक्याण्णव हजार तीनशे अठ्ठेचाळीस फक्त) इतकी रक्कम अनुज्ञेय आहे. आता, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीतून थकबाकीची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राथमिक शिक्षणावरील खर्चासाठी शिफारस केल्यानुसार सन २०१८-१९ ते सन २०२२-२३ मधील अनुज्ञेय वेतन अनुदान व मागील काही वर्षासाठीचे थकीत वेतन अनुदान तसेच यापूर्वी संदर्भ क्र. (३) व (४) येथील शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान विचारत घेता, एकूण रु. १६८,५३,९१,३४८/- (रूपये एकशे अडूसष्ट कोटी त्रेपन्न लाख एक्याण्णव हजार तीनशे अठ्ठेचाळीस फक्त) इतकी वेतन थकबाकी अदा करावयाची शिल्लक आहे.

२. आर्थिक वर्ष २०२३-२४ करीता बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या प्राथमिक शिक्षणावरील खर्च भागविण्याच्या प्रयोजनासाठी लेखाशिर्ष (२२०२ ०१९१) ३६-सहायक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु. ३७,६४,६४,०००/- ( रुपये सदतीस कोटी चौसष्ट लाख चौसष्ट हजार फक्त ) इतकी तरतूद मंजूर आहे. त्यापैकी, बृहन्मुंबई महानगरपालिकेस देय प्राथमिक शिक्षणावरील रक्कमेच्या थकबाकीपैकी वित्त विभागाने निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीनुसार, बृहन्मुंबई महानगरपालिकेस रु.३,०१,१७,१२०/- ( रुपये तीन कोटी एक लक्ष सतरा हजार एकशे वीस फक्त ) इतकी रक्कम वेतन अनुदान म्हणून अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. यावर होणारा खर्च "मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ०१ प्राथमिक शिक्षण, १९१ स्थानिक संस्थांना सहाय्य (०१) इतर स्थानिक संस्थाना अर्थसहाय्य (०१) (०१) मुंबई महानगरपालिकेस अनुदान (अनिवार्य) (२२०२ ०१९१) ३६-सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षा अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून अदा करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

४. सदर खर्चासाठी शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच, आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३०६१८२४१८७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAMOD VITHOBA KADAM

Digitally signed by PRAMOD VITHOBA KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=f82b9e0b005ed06987e1ae26683203c8f241022e0aad6b1c827af561b72f83bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF4901BED6A4BEE0ED963C63F1B0172A4718894A400C0988FBB3381DB913696F, cn=PRAMOD VITHOBA KADAM
Date: 2024.03.06 18:33:53 +05'30'

**( प्रमोद कदम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव.
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव.
४) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
७) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१३) महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२, महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१४) शिक्षणाधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका शिक्षण विभाग, करी रोड (पूर्व), मुंबई
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६) स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने
१८) निवड नस्ती, एसएम-४.